राज्य शासकीय कर्मचारी सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), बेसा या संस्थेचा भूखंड गहाणमुक्त करण्यास मंजूरी देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**सहकार ,पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र .घबांक ३७२०/प्र.क्र.२६/१९-स,**

न्यु इंडीया ॲश्युरन्स बिल्डींग, ३ रा मजला,
बॅक ऑफ इंडीया समोर, एम.जी. रोड,
फोर्ट, मुंबई ४०० ००१
दिनांक : ०३ मार्च, २०२०

**संदर्भ** -: १) शासन निर्णय क्र. एचएसजी-१०९२/प्र.क्र.९७३/पहिला/१८-सी, दि. १३/०१/१९९५
२) शासन निर्णय क्र. एचएसजी-१०९२/प्र.क्र.९७३/दुसरा/१८-सी, दि. ०७/०३/१९९६,
३) शासन निर्णय क्र. एचएसजी-१०९२/प्र.क्र.९७३/पहिला व दुसरा /१८-सी, दि. २८/०३/१९९६,
४) शासन निर्णय क्र. एचएसजी-१०९२/प्र.क्र.९७३/तिसरा/१८-सी, दि २९/०३/१९९७.
५) संस्थेचा प्रस्ताव दिनांक ०५/११/२०१९

**प्रस्तावना:-**

राज्य शासकीय कर्मचारी सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), बेसा जिल्हा नागपूर या संस्थेतील एकुण ३३ पात्र सभासदांना संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये एकुण कर्ज रुपये ३१,९८,७५५/- (रुपये एकतीस लाख पंच्याऐंशी हजार फक्त) इतके कर्ज मंजूर करण्यात आले होते. तथापि संस्थेला एकुण कर्ज रुपये ३१,९८,७५५/- इतके वितरीत करण्यात आले होते.

संदर्भ क्र.३ येथे संस्थेने सादर केलेल्या प्रस्तावानुसार तसेच सर्व ३३ कर्जदार सभासदांनी त्यांना वितरीत केलेली कर्जाची रक्कम त्यावरील व्याजासह शासनास परतफेड केली आहे .तसेच सर्व सभासदांना निर्गमित केलेल्या ना-देय प्रमाणपत्रांवरुन व कार्यासन १९-स मधील खतावणीमधील नोंदीवरुन संस्थेला दिलेले कर्ज व्याजासह वसुल झाल्याचे दिसुन येते. संस्थेकडे शासनाचे येणे बाकी नसल्यामुळे संस्थेचा भूखंड गहाणखतातून मुक्त करण्याचा संस्थेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर बाब विचारात घेऊन शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय:**

राज्य शासकीय कर्मचारी सहकारी गृहनिर्माण संस्था (मर्या.), बेसा, जिल्हा नागपूर या संस्थेच्या एकूण ३३ सभासदांना वितरीत करण्यात आलेले गृहबांधणी कर्ज रु. ३१,९८,७५५/- (रुपये एकतीस लाख अठ्ठ्यान्नव हजार सातशे पंचावन फक्त) व त्यावरील संपूर्ण रक्कम व्याजासह शासनास परतफेड केली आहे. सबब, सदर संस्थेकडे शासनाचे कोणतेही येणे बाकी नसल्याने संस्थेने शासनाकडे गहाण ठेवलेला मुक्काम पोस्ट बेसा, तालुका व जिल्हा नागपूर येथील गट क्र. ८९/२ मधील खालीलप्रमाणे चतु:सिमा असलेला १२,१०२.८९ चौरस मीटर क्षेत्रफळ असलेला संस्थेचा भुखंड व त्यावरील बांधकाम गहाणखतातुन मुक्त करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| पुर्वेकडे | : | सर्व्हे नं. ८८, |
| पश्चिमेकडे | : | रोड, (मानेवाडा-घोघली), |
| उत्तरेकडे | : | सर्व्हे नं. ८९/१, |
| दक्षिणेकडे | : | सर्व्हे नं. ८९/३. |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०२००३०३१६५२३१६८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

ASHOK SHANKAR BHUJBAL

Digitally signed by ASHOK SHANKAR BHUJBAL
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=d0603fd89ef561b0b051d6283b2c15bb82dcdd5e5dfe04798b8f19ffa9581722, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=fdb9a467c1125b3a23797088f3433a330c41502619eaa43bd29e751716ff3946, ou=CO OPERATION TEXTILE AND MARKETING DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ASHOK SHANKAR BHUJBAL
Date: 2020.03.03 16:55:25 +05'30'

**(अ. शं. भुजबळ)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य मुंबई-०१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), (२ प्रती)
२) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य नागपूर-०२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), (२ प्रती)
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था पुणे.
६) संचालक, विमा संचालनालय, मुंबई गृहनिर्माण भवन (म्हाडा) खोली क्र.२६४, पहिला मजला, बांद्रा (पुर्व) ४०० ०५१
७) जिल्हाधिकारी, नागपूर
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था नागपूर.
९) जिल्हा विशेष, लेखापरिक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, नागपूर
१०) अध्यक्ष, राज्य शासकीय कर्मचारी सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), बेसा, जिल्हा नागपूर
११) निवडनस्ती.